राज्यातील मच्छिमार, मत्स्यसंवर्धक व मत्स्यकास्तकारांना कृषी क्षेत्राप्रमाणे अनेक पायाभूत सुविधा व सवलतीं उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने मत्स्यव्यवसाय क्षेत्रास (प्रक्रिया उद्योग वगळता) कृषी समकक्ष दर्जा देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मत्स्यवि २०२३/प्र.क्र. ०६ /पदुम १३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२.
दि. ०९ मे, २०२५

**वाचा:** आयुक्त मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र जा.क्र.मत्स्य/नि/१११२०६/८५/२०२२-२३ (भाग-२)/८९ दि.२०/२/२०२५

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र एक कृषी प्रधान राज्य असून राज्यातील ग्रामीण अर्थव्यवस्था शेतीबरोबरच कृषीसंलग्न क्षेत्रे जसे पशुपालन,मत्स्यपालन तसेच फळफळावळ -भाजीपाला उत्पादनासारख्या पूरक क्षेत्रांशी जोडलेली आहे. देशाला परकीय चलन तसेच प्रथिनयुक्त अन्न पुरविण्यात मत्स्यव्यवसायाचे मोठे योगदान आहे. नैसर्गिक जलस्रोतांमध्ये पारंपारिक मासेमारी हळूहळू शास्त्रोक्त मत्स्यपालनाकडे वाटचाल करीत आहे. महाराष्ट्र राज्यातील जलसंपत्तीचा जास्तीत जास्त शाश्वत वापर करण्यासाठी मत्स्यबीज संचयन आधारित मत्स्यपालन तसेच पिंजरा संवर्धनासारख्या विविध तंत्रज्ञानाचा वापर केला जात आहे. महाराष्ट्र राज्यात कृषी प्रमाणे मत्स्यव्यवसाय क्षेत्र चांगले उत्पादन व उत्पन्न घेण्यास सक्षम आहे.

तथापि कृषी क्षेत्राशी साधर्म्य असून देखील अद्याप मत्स्य व्यवसायास कृषी समकक्ष दर्जा प्राप्त झाला नसल्याने मच्छिमार, मत्स्यसंवर्धक व मत्स्यकास्तकारांना अनेक पायाभूत सुविधा व सवलतीं पासून वंचित राहावे लागते. आंध्र प्रदेश, छत्तीसगड, झारखंड, बिहार व कर्नाटक या राज्यांनी प्रामुख्याने मत्स्यव्यवसायास कृषी समकक्ष दर्जा देण्याच्या दृष्टीने वीज दरात सवलत, किसान क्रेडीट कार्ड, कृषी दरानुसार कर्ज सहाय्य, विमा दरात सवलत, उपकरणे वर सवलत अश्या प्रकारच्या सुविधा उपलब्ध करुन दिल्या आहेत. परिणामी त्या राज्यांच्या मत्स्योत्पादनात वाढ झाल्याचे निदर्शनास येते.

सबब आंध्र प्रदेश, छत्तीसगड राज्याप्रमाणे महाराष्ट्र राज्यातील मच्छिमार, मत्स्यसंवर्धक व मत्स्यकास्तकारांना अनेक पायाभूत सुविधा व सवलतीं उपलब्ध करून देवून ग्रामीण अर्थव्यवस्था बळकटीकरण व राज्याच्या मत्स्य उत्पादनामध्ये भरीव वाढ करण्याच्या दृष्टीने व स्थानिक पातळीवर मत्स्यव्यवसायाद्वारे मोठ्या प्रमाणात रोजगार निर्मिती होण्याकरिता मत्स्यव्यवसायाला कृषी समकक्ष दर्जा देणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयाद्वारे मच्छिमार, मत्स्यकास्तकार मत्स्यउत्पादक, मत्स्यव्यवस्थापन, मत्स्यबीज संवर्धक, मत्स्यबोटुकली संवर्धन करणारे घटक, Post Harvesting यामध्ये वर्गीकरण, प्रतवारी, आवेष्ठन, साठवणूक करणारे घटक अशा व्यक्तींना कृषी क्षेत्राप्रमाणे अनेक पायाभूत सुविधा व सवलतीं उपलब्ध करून देवून राज्याच्या मत्स्य उत्पादनामध्ये भरीव वाढ करण्याच्या दृष्टीने व स्थानिक पातळीवर मत्स्यव्यवसायाद्वारे मोठ्या प्रमाणात रोजगार निर्मिती होण्याकरिता मत्स्यव्यवसाय क्षेत्रास (प्रक्रिया उद्योग वगळता) कृषी समकक्ष दर्जा देण्यास मान्यता देण्यात येत आहे .

मत्स्यशेतकरी/संबंधित मत्स्यसंवर्धन प्रकल्प (प्रक्रिया उद्योग वगळता) यांना कृषी दराने वीज अनुज्ञेय करण्यात येत आहे. मत्स्यशेतकऱ्यांना किसान क्रेडिट कार्ड, बँकांकडून कृषी दराने कर्ज सुविधा, इत्यादी आणि कृषीनुसार अल्प दराने विमा संरक्षणाचा लाभ अनुज्ञेय करण्यात येत आहे. शेतकऱ्यांना सौर उर्जेबाबत उर्जा विभागाद्वारे देण्यात येणारे लाभ मत्स्यव्यवसायिकांना देण्यास मान्यता देण्यात येत आहे .

मच्छिमार, मत्स्यसंवर्धक, मत्स्यव्यवसायिक, मत्स्यकास्तकार, मत्स्यबीज/मत्स्यबोटूकली संवर्धक, मत्स्यव्यवस्थापन यांच्या व्याख्या खालीलप्रमाणे स्पष्ट करण्यात येत आहेत.

**मच्छिमार :-**

ज्या व्यक्तीचा प्रत्यक्ष मासेमारी करणे व मासेमारी अनुषंगिक कार्य (जसे मासे विक्री, मासे सुकविणे इत्यादी) हा प्रमुख व्यवसाय आहे, अशा व्यक्तीस " मच्छिमार " संबोधण्यात यावे.

**मत्स्यसंवर्धक :-**

जी व्यक्ती मत्स्यतळे, मत्स्यपिंजरे, बायोफ्लॉक, RAS (पुनर्प्रसारित जलसंवर्धन प्रणाली), शोभिवंत मत्स्यव्यवसाय ( लघु / मध्यम आकारातील संवर्धन प्रकल्प ), इत्यादी विविध तंत्रज्ञानाद्वारे मत्स्यबीज संचयन करून त्याद्वारे मासे, कोळंबी, इत्यादीची निर्मिती करत असेल, अशा व्यक्तिला "मत्स्यसंवर्धक " असे संबोधण्यात यावे.

**मत्स्यव्यवसायिक :-**

मत्स्यबीज निर्मिती, मासेविक्री, मासेवाहतुक, मासे साठवणुक करणारे, माशांसाठी बर्फ निर्माते, जाळी विणणारे, जाळी पुरवठा करणारे, होडी निर्माते / पुरवठादार, मत्स्यप्रकिया करणारे मुल्यावर्धित मासळी उत्पादन करणारे तसेच माश्यांवर विविध प्रक्रिया करून जोड उत्पादने तयार करणारे इत्यादी अनेक प्रकारे मत्स्यव्यवसायाशी निगडीत कामे करणाऱ्या व्यक्ती ज्या मच्छिमार, मत्स्यसंवर्धक व्याख्येत बसणाऱ्या व्यक्तींव्यतिरिक्त आहेत अशा व्यक्तीस " मत्स्यव्यवसायिक " संबोधण्यात यावे.

**मत्स्यकास्तकार :-**

जो शेतकरी शेततलाव अथवा शेतीमध्ये खोदकाम करुन मत्स्य तलाव तयार करेल व त्यामध्ये मासे, कोळंबी, शिंपले इत्यादीची मत्स्यशेती करेल अशा शेतकऱ्यास " मत्स्यकास्तकार" म्हणुन संबोधण्यात यावे.

**मत्स्यबीज/ मत्स्यबोटूकली संवर्धक :-**

जो व्यक्ती संचयन तलाव/संवर्धन तलाव/ संगोपन तलाव अथवा इतर कोणत्याही सामुग्री पासुन बनविलेले तलाव यामध्ये मत्स्यजिऱ्याचे संगोपन करुन मत्स्यबीज अथवा मत्स्यबोटूकली तयार करेल त्यास " मत्स्यबीज/ मत्स्य बोटूकली संवर्धक " म्हणुन संबोधण्यात यावे.

**मत्स्यव्यवस्थापन** (Post Harvesting ) :-

मासळी पकडणे (Capture) अथवा संवर्धन (Culture) द्वारे प्राप्त मासळीचे वर्गीकरण, प्रतवारी, प्रथम/ काढणी पश्चात प्रक्रिया, त्यापासून मुल्यावर्धन, संस्करण व विपणन इत्यादीची प्रक्रिया म्हणजे “मत्स्यव्यवस्थापन” असे संबोधण्यात यावे.

या शासन निर्णयाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय दि.२२/०४/२०२५ रोजी पार पडलेल्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीतील निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०५०९१४४७०५०४६८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAMASWAMI NALLAMUTHU

Digitally signed by RAMASWAMI NALLAMUTHU
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Animal Husbandry and ADF dept, 2.5.4.20=0138D8EEC69C4E56C26D100E164E69EE4C46F9D49770872D76033D4A74ACA6D5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=93AE2B3BE9F892A994AABD7443D2AD15D0E9E4A3E45CA3D24B4C35707E70479C, cn=RAMASWAMI NALLAMUTHU
Date: 2025.05.09 14:49:33 +05'30'

**( डॉ. रामास्वामी एन. )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत: -**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६. अप्पर मुख्य सचिव (महसूल) मंत्रालय, मुंबई ३२
७. प्रधान सचिव (नियोजन) मंत्रालय मुंबई ३२
८. अप्पर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय मुंबई ३२
९. प्रधान सचिव (ऊर्जा) मंत्रालय मुंबई ३२
१०. प्रधान सचिव (सहकार ) मंत्रालय मुंबई ३२
११. सचिव (जलसंपदा) मंत्रालय मुंबई ३२
१२. सचिव( पदुम) मंत्रालय मुंबई ३२
१३. सचिव (लक्षेवि) मंत्रालय मुंबई ३२
१४. आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योद्योग विकास महामंडळ, मुंबई
१६. सर्व प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय
१७. सर्व जिल्हा सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय
१८. निवड नस्ती पदुम-१३